<u>वित्तीय वर्ष २०१४-२०१५</u>

**मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाला उपकराची रक्कम वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : बजेट-१०१४/ प्र.क्र.१७६/ दुवपु-२,**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**

**दिनांक : ०५.०३.२०१५**

**संदर्भ - १. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अंदाज २०१३/ प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०२.०१.२०१५ व दि.०९.०२.२०१५.**

**२. या विभागाचा समक्रमांकाचा दि.१९.१२.२०१४ चा शासन निर्णय**

<u>**प्रस्तावना**</u>

मुंबई शहर बेटावरील जुन्या व मोडकळीस आलेल्या उपकर प्राप्त इमारतींची दुरुस्ती/ पुनर्बांधणी करणे ही शासनाची वैधानिक जबाबदारी आहे. मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८२ अन्वये मुंबई शहर बेटावरील इमारतींवर दुरुस्ती उपकर आकारला जातो. तसेच कलम ८५ अन्वये तो बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून वसूल करण्यात येतो व एकूण वसुलीच्या ५ टक्के वटावाची रक्कम वगळून उर्वरीत रक्कम राज्याच्या एकत्रित निधीत जमा करण्यात येते. ही रक्कम विनियोजनान्वये, अर्थसंकल्पित करुन ती मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत वर्ग करण्यासाठी राज्य शासनाकडून हस्तांतरीत करण्यात येते.

## शासन निर्णय

मुंबई शहरातील उपकरप्राप्त इमारतींच्या दुरुस्ती व पुनर्रचना कार्यक्रमासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाला मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत वर्ग करण्याकरिता दुरुस्ती उपकराच्या रकमेपोटी देण्यासाठी सन २०१४- १५ च्या अर्थसंकल्पात *मागणी क्र.क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०,सर्वसाधारण, ८००,इतर खर्च,* (००)(०५) *मुंबई इमारत दुरूस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरीता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाला उपकराच्या वसुलीची रक्कम देणे* (२२१६ ०६२५)- ३२, *अंशदाने*या लेखाशिर्षाखाली रू.५०,००,००,०००/-(रुपये पन्नास कोटी फक्त) इतकी तरतूद करण्यात आलेली आहे.

सदर तरतुदीपैकी रुपये ३०,००,००,०००/-(रुपये तीस कोटी फक्त) इतकी तरतूद याआधी वित्त विभागाच्या मान्यतेने दि.१९.१२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आली आहे.

वित्त विभागाने दि.०९.०२.२०१५ च्या परिपत्रकान्वये योजनेतर अर्थसंकल्पित तरतुदीच्या ८५% च्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास सहमती दर्शविली आहे. **याप्रमाणे आता उपरोक्त शीर्षाखालील अर्थसंकल्पित तरतुदीपैकी रुपये १२,५०,००,०००/-(रुपये बारा कोटी पन्नास लक्ष फक्त) इतकी तरतूद महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.**

२. दुरुस्ती उपकराची रक्कम रुपये १२,५०,००,०००/-(रुपये बारा कोटी पन्नास लक्ष फक्त) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास, शासनाच्या गृहनिर्माण विभागाचे अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक, प्राधिकरणाने सादर केल्यानंतर वितरीत करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.०९.०२.२०१५ च्या परिपत्रकातील दिलेल्या सुचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०७१२१९५४८८०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vikram Vishnu Nikam

Digitally signed by Vikram Vishnu Nikam
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=4000032, st=Maharashtra, cn=Vikram Vishnu Nikam
Date: 2015.03.09 11:42:19 +05'30'

**(वि.वि.निकम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
२) मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
३) प्रधान महालेखपाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई,
४) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
५) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
६) मुख्य लेखाधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
७) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, संगणक शाखा, मुंबई
८) अधिदान व लेखाधिकारी, नवीन प्रशासकीय भवन, वांद्रे कुर्ला संकुलन, मुंबई-५१ (२ प्रती)
९) अवर सचिव (लेखा कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) वित्त विभाग(व्यय-३ कार्यासन) (अर्थोपाय कार्यासन)(अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-३२
११) अवर सचिव (अर्थसंकल्प-१/ रोखशाखा) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१३) निवड नस्ती (दुवपु-२ कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.